भिवंडी-निजामपूर शहर महानगर पालिकेच्या
स्व.इंदिरा गांधी स्मृती रुग्णालयात कार्यरत
अधिकारी / कर्मचारी यांच्या समावेशनाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भिनिरु २०१३/ प्रक्र-७/आरोग्य ३अ**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय सकुल इमारत, १० वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३० जानेवारी, २०१५.

वाचा:-

१) **शासन निर्णय क्रमांकः रुग्णालय २००७/प्रक्र.३९४/०७/ आरोग्य-४ दि.०८ फेब्रुवारी,२०११.**
२) **शासन निर्णय क्रमांकः रुग्णालय २००७/प्रक्र.३९४/०७/ आरोग्य-४ दि.२० जून,२०११.**

प्रस्तावना:-

भिवंडी-निजामपूर शहर महानगर पालिकेचे स्व.इंदिरा गांधी स्मृती रुग्णालय, सार्वजनिक आरोग्य विभागास हस्तांतरीत करुन १०० खाटांचे सुसज्ज उपजिल्हा रुग्णालय स्थापन करण्याचा शासन निर्णय दिनांक २४.०७.२००९ रोजी निर्गमित करण्यात आला त्यास नगर विकास विभागाने शासन निर्णय दिनांक १६.११.२००९ अन्वये मान्यता दिली. शासन निर्णय दिनांक ०८.०२.२०११ सोबतच्या करारनाम्यानुसार जे कर्मचारी शासन नियमानुसार आवश्यक अर्हता व प्रचलित सेवा शर्ती पूर्ण करतात त्यांना सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभागाच्या मान्यतेच्या अधीन राहून शासन सेवेत सामावून घेणेबाबत विकल्प देतील अशा कर्मचा-यांना शासन सेवेत सामावून घेण्यात येईल असे ठरविण्यात आले होते. त्यानुसार महानगर पालिकेच्या ४१ कर्मचा-यांनी शासन सेवेत समावेशनाचा विकल्प दिला आहे. त्यामुळे या कर्मचा-यांना शासनसेवेत समायोजित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

भिवंडी-निजामपूर शहर महानगर पालिकेचे स्व.इंदिरा गांधी स्मृती रुग्णालयातील ४१ अधिकारी/कर्मचा-यांना ( सोबत जोडलेल्या यादीनुसार ) ,खाली नमुद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन सेवेत समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) ज्या दिनांकास उक्त कर्मचारीवृदांचे समावेशन आदेश निर्गमित होतील त्या दिनांकापासून ते शासन सेवेत प्रविष्ट झाल्याचे समजण्यात येईल.
२) ज्या कर्मचारी वृंदाना या पूर्वीपासून महाराष्ट्र नागरी सेवा (सेवा निवृत्ती) नियम १९८१ लागू आहेत. त्यांच्या मुळ नियुक्तीच्या दिनांकापासून त्यांच्या सेवा, सेवानिवृत्ती वेतन व अन्य सेवा विषयक लाभाकरिता गणण्यात येतील.
३) १ नोव्हेबर, २००५ व त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचारी वृंदाना अंशकालीन सेवा निवृत्ती वेतन योजना लागु राहील.

४) शासन समावेशनाच्या दिनांकापासून गट-अ, गट-ब व गट-क मधील कार्यरत कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधी लेखा महानगर पालिका, भिवंडीव्दारा, महालेखापाल, मुंबई यांचेकडे शिल्लकेसह हस्तांतरीत करण्यात यावेत.

५) शासनाच्या प्रचलित नियमानुसार गट-ड मधील कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधी लेखे कार्यालयीन प्रमुख म्हणजे वैद्यकीय अधिक्षक यांचेकडे महानगर पालिका भिवंडी यांनी अंतिम शिल्लकेसह वर्ग करावेत.

६) शासन समावेशनाच्या दिनांकापासून समावेशित कर्मचा-यांचे शासनाच्या प्रचलित नियमानुसार भविष्य निर्वाह निधी, गट विमा योजना, व्यवसाय कर, आयकर व इतर वजाती करण्यात याव्यात.

७) समावेशनाच्या दिनांकास जे कर्मचारी सेवा प्रवेश नियमातील पूर्व निर्धारीत वयाची अट पूर्ण करित नाहीत. त्यांना ही अट शिथिल करण्यात यावी.

८) समावेशीत कर्मचारीवृंदानी जात वैघता प्रमाणपत्र, मराठी, हिंदी भाषा परिक्षा, एमएससीआयटीचे प्रमाणपत्र, टंकलेखनाची अर्हता याबाबींची पूर्तता १ वर्षाच्या आत करण्याच्या अटीवर त्यांचे समावेशन करण्यात यावे.

९) सदरील समावेशित कर्मचा-यांच्या सेवा त्या त्या संवर्गात शासन समावेशनाच्या दिनांकापासून शून्य ज्येष्ठतेवर समाविष्ट करण्यात येतील.

१०) समावेशित कर्मचारीवृंदाना यापूर्वीचा सेवा कालावधी हा शासनाच्या प्रचलित नियमानुसार रजा, आश्वासित प्रगती योजना व अन्य लाभाकरिता, अनुज्ञेय समजण्यात यावा.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ०२/१५/सेवा-४ दिनांक ६.०१.२०१५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२९१४०१०८४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.01.30 17:33:12 +05'30'

(शेखर ढवळे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुबई-४०० ०३२.

४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई-४०० ००१.
५. आयुक्त,भिवंडी-निजामपूर शहर महानगर पालिका, भिवंडी, जिल्हा-ठाणे
६. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा(प्राथमिक आरोग्य केंद्र-जिल्हास्तर), मुंबई
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
९. जिल्हा शल्य चिकीत्सक, ठाणे,
१०. जिल्हा आरोग्य अधिकारी, ठाणे
११. जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
१२. महालेखापाल, १/२ महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
१३. [वित्त विभाग (व्य-१३), (वि.सु-१), (अर्थसंकल्प-८), सेवा-४, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४. उपसचिव( सेवा) सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
१५. अवर सचिव (सेवा-१/२/३/५), सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई-१
१६. अवर सचिव( अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई-१
१७. निवड नस्ती (आरोग्य३-अ)

भिवंडी-निजामपूर शहर महानगर पालिकेच्या सेवेतून शासन सेवेत समावेशन होणा-या
अधिकारी / कर्मचारी यांचे विवरणपत्र.

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचा-यांचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ.श्रीमती.जयश्री संजय म्हस्के(कु.जयश्री शिवराम डोंगरे) | वैद्यकीय अधिकारी- वर्ग-२ |
| २ | डॉ.अविनाश हंबीरराव धनवडे | वैद्यकीय अधिकारी- वर्ग-२ |
| ३ | श्री.निलेश कविश्वर कोळी | भौतिकोपचार तज्ञ |
| ४ | श्रीमती.कल्पना नारायण वानखेडे | औषध निर्माता |
| ५ | श्रीमती सईदा आरीफ मेमन(कु.सईदाबानो ए.रजाक) | परिसेविका |
| ६ | श्रीमती.गौतमा किरण कोकाटे(कु.गौतमा रुखमाजी भिसे) | परिसेविका |
| ७ | श्रीमती सविता अशोक साळवी(कु.सविता केशव पाटील) | परिसेविका |
| ८ | श्रीमती सुधा नानासाहेब कुंभार(कु.सुधा शिवलिंग कुंभार) | अधिपरिचारीका |
| ९ | श्रीमती अश्विनी अशोक पाटील(कु.उषा परशराम घोडविंदे) | अधिपरिचारिका |
| १० | श्रीमती अश्विनी सुधाकर नाडे(कु.हर्षदा नागेश नायडू) | अधिपरिचारीका |
| ११ | श्रीमती सुमती सुधीर मारुळकर(कु.संगीता शामकांत दर्शने) | अधिपरिचारीका |
| १२ | श्रीमती.उर्मिला सुमंत निकम | अधिपरिचारीका |
| १३ | श्रीमती लता गंगाधर कोहाड(कु.लता खोजराम पलेरिया) | अधिपरिचारीका |
| १४ | श्रीमती सिमा संजय चव्हाण(कु.मंगला सहदेव आवळेगावकर) | अधिपरिचारीका |
| १५ | श्रीमती स्मिता सुधीर सांडव(कु.रंजना श्रीधर वंजारे) | अधिपरिचारीका |
| १६ | श्रीमती मनाली संजय राणे(कु.राजश्री बापु सावंत) | अधिपरिचारीका |
| १७ | श्रीमती मंगल अविनाश भागवत(कु.मंगला रामचंद्र कांबळी) | अधिपरिचारीका |
| १८ | श्रीमती प्रविणा देविदास शिरशीकर(कु.प्रविणा प्रभाकर व्यवहारे) | अधिपरिचारीका |

| | | |
|---|---|---|
| १९ | श्रीमती सुशिला नाथु वायळ | अधिपरिचारीका |
| २० | श्रीमती सोनाली संतोष ठाकरे(कु.रोहिणी रामु गवळी) | अधिपरिचारीका |
| २१ | श्रीमती मानसी महेश वायडा(कु.वंदना भाऊ भोईर) | अधिपरिचारीका |
| २२ | श्रीमती दिपा राजेंद्र देवळे | अधिपरिचारीका |
| २३ | श्रीमती अर्चना सूर्यकांत जाधव | अधिपरिचारीका |
| २४ | श्रीमती सुनिता मधुकर भुसारे | अधिपरिचारीका |
| २५ | श्रीमती सुलभा रामु पाटील | अधिपरिचारीका |
| २६ | श्रीमती.विद्या रमेश जाधव | अधिपरिचारीका |
| २७ | श्रीमती सुषमा मधुकर ठाकरे | अधिपरिचारीका |
| २८ | श्रीमती विद्या नारायण पाटील | अधिपरिचारीका |
| २९ | श्रीमती विशाखा विनोद पाटील(कु.रंजना मधुकर शेलार) | अधिपरिचारीका |
| ३० | श्रीमती प्राजक्ता सचिन शिंदे(कु.प्राजक्ता पंढरीनाथ चाकणकर) | अधिपरिचारीका |
| ३१ | श्रीमती.सुरेखा शिवाजीराव भोसले | अधिपरिचारीका |
| ३२ | श्रीमती कृतिका कृष्णा दळवी(कु.जयश्री अंकुश देसाई) | अधिपरिचारीका |
| ३३ | श्री. सखाराम गंगाराम पांगारे | कनिष्ठ लिपीक |
| ३४ | श्री.जयराम भे-या पवार | व्रणोपचारक |
| ३५ | श्री. आत्माराम मंगळ चंदे | कक्षसेवक |
| ३६ | श्री.रविंद्र खंडु सोनवळे | कक्षसेवक |
| ३७ | श्री.शिवराम सखाराम चवर | कक्षसेवक |
| ३८ | श्री. चंद्रशेखर परशुराम पुण्यार्थी | कक्षसेवक |
| ३९ | श्री.अर्जुन लहू गरेल | कक्षसेवक |
| ४० | श्री.शरद सिताराम चौगुले | कक्षसेवक |
| ४१ | श्री. प्रविण अभिमन्यू शेंडगे | कक्षसेवक |